रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत १५ व्या ॲग्रोव्हीजन २०२४ कृषी प्रदर्शनीमध्ये खर्चाची देयके अदा करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपववि ४००२१/४/२०२५ DESK SERICULTURE- CMTD**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक: ३१ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक प्रावियो-१०१८/प्र.क्र.१९/ रेशीम कक्ष, दिनांक १८ एप्रिल, २०१८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक प्रावियो-१०१८/प्र.क्र.१९/ टेक्स-५, दिनांक २ जून, २०२३.
३) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-२०२४/ प्र.क्र.६५/ अर्थबळ-३, दि.२५ जुलै, २०२४
४) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-१०२४/ प्र.क्र.८०/ अर्थबळ-३, दि.१२ फेब्रुवारी, २०२५
५) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्रमांक रेशीम/कार्या-१०/१५ ॲग्रोव्हीजन २०२४/प्रदर्शनी/ देयक/२०२४/२६५, दिनांक ११ मार्च, २०२५
६) वित्त विभाग परिपत्रक अर्थसं-१०२४/ प्र.क्र.८०/ अर्थबळ-३, दि.१७ मार्च, २०२५.
७) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्रमांक सपववि ४००१२/१४/२०२५/ DESKSERICULTURE- CMTD दिनांक २८ मार्च, २०२५.

**प्रस्तावना :-**

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, नागपूर येथे आयोजित केलेल्या "१५ व्या ॲग्रोव्हीजन २०२४" कृषी प्रदर्शनीमध्ये रेशीम संचालनालयांतर्गत जिल्हा रेशीम कार्यालय भंडारा व जिल्हा रेशीम कार्यालय नागपूर यांनी टसर व तुती रेशीम उद्योगाच्या माहितीबाबतचा स्टॉल उभारण्यात आला होता. सदर ॲगोव्हीजन- २०२४ च्या कृषी प्रदर्शनातील रेशीम उद्योगाची जाहीरात प्रसिध्दी व त्या अनुषंगाने इतर आवश्यक खर्चाचे देयके अदा करण्यासाठी संचालक (रेशीम) यांनी दिनांक ११ मार्च, २०२५ रोजीच्या पत्रान्वये बीम्स प्रणालीवर निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुसार सदर योजनेअंतर्गत देयकाचा खर्च भागविण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती वित्त विभागास करण्यात आली आहे. वित्त विभागाने सदर योजनेंतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षामध्ये सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत विभागाकडे उपलब्ध असलेल्या तरतूदीतुन निधी खर्च करण्यास मान्यता दिली आहे. सबब, रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिध्दी कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षातील प्रलंबित देयकांचा खर्च भागविण्यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रेशीम उद्योगाच्या प्रचार व प्रसिद्धी कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात डॉ.पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, नागपूर येथे आयोजित केलेल्या "१५ व्या ॲग्रोव्हीजन

२०२४" कृषी प्रदर्शनीमध्ये मध्ये उभारण्यात आलेल्या रेशीम स्टॉल भाडे व अनुषंगीक खर्चाची देयके अदा करण्यासाठी ₹२,८२,६२६/- (अक्षरी रुपये दोन लक्ष ब्याऐंशी हजार सहाशे सव्वीस फक्त) इतका निधी वितरीत व खर्च करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च करताना, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम, प्रचलीत अटी व शर्तीचे तसेच नियोजन व वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्याच्या अटीच्या अधिन राहून मान्यता प्रदान करण्यात येत आहे. निधीचे विनियोग प्रमाणपत्र महालेखापाल व शासनास विहित मुदतीत सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर निधी ज्या बाबीसाठी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. उक्त निधी कोषागारातून आहरण व संवितरण करण्यासाठी लेखाधिकारी, रेशीम संचालनालय, नागपूर यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच, संचालक, रेशीम संचालनालय, नागपूर यांना नियंत्रण अधिकारी (V०००३) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे. उक्त निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर संचालक (रेशीम) यांच्या अधिनस्त सुपूर्द करण्यात येत आहे.

५. उक्त खर्च हा "मागणी क्र.व्ही-२, २८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग, ००, १०७, रेशीम उद्योग, (०१) विविध सहकारी संस्थांना सहाय्य, (०१)(०१) राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ अंतर्गत रेशीम उद्योगाचा प्रचार व प्रसिद्धी (कार्यक्रम) (२८५१ ६५७४), २६, जाहिरात व प्रसिद्धी" अंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक २७०/२०२५,व्यय-२,दि.२९.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३३१२००३१५५३०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ALKA VISHRAMRAO JAGTAP

Digitally signed by ALKA VISHRAMRAO JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA VISHRAMRAO JAGTAP
Date: 2025.03.31 20:04:08 +05'30'

**(अलका जगताप)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर.
४) अ.मु.स (नियोजन) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
५) अ.मु.स (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
७) प्रधान सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

८) उप सचिव (अर्थसंकल्प), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (१७-स) सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) कोषागार अधिकारी, नागपूर
११) सहायक संचालक, प्रादेशिक रेशीम कार्यालय, नागपूर
१२) रेशीम विकास अधिकारी श्रेणी-१, जिल्हा रेशीम कार्यालय, नागपूर .
१३) निवड नस्ती (रेशीम कक्ष).